सन २०१९-२० करीता क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य वितरीत करण्याबाबत .

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्रीडायो-२३१९/प्र.क्र.१८३/क्रीयुसे-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २७ मार्च, २०२०.

**वाचा:-**

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचा शासन निर्णय क्र.राक्रीधो-२०१२/प्र.क्र.२६०/क्रीयुसे १, दिनांक ०१ मार्च, २०१४.

२) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे दिनांक १८/२/२०२० चे पत्र.

**प्रस्तावना:-**

राज्यातील खाजगी/शासनाच्या मार्फत चालविण्यात येणाऱ्या व राज्य शासनाच्या संबंधित विभागांनी मान्यता दिलेल्या शैक्षणिक संस्था, विविध खेळांच्या विकासासाठी कार्यरत असणाऱ्या व सार्वजनिक विश्वस्त अधिनियम १९५० किंवा संस्था नोंदणी अधिनियम १८६० अन्वये पंजीबध्द असतील अशा व्यायाम संस्था, क्रीडा मंडळे, क्रीडा संघटना इत्यादींना क्रीडा सुविधा निर्मितीस व क्रीडा साहित्यासाठी ७५:२५ (शासन व संबंधित संस्था) या प्रमाणात अनुदान देण्यास संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. "क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य करणे" ही क्रीडा धोरणातील एक महत्वाची शिफारस आहे. राज्यातील शैक्षणिक संस्था, खाजगी क्लब, क्रीडा मंडळे, प्राधिकरणे, स्थानिक स्वराज्य संस्था यामधून दर्जेदार क्रीडा सुविधा निर्माण करुन त्याव्दारे खेळाडूंच्या कामगिरीत वाढ करुन राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय खेळाडू निर्माण करण्यास चालना देणे, हे या योजनेचे उद्दिष्ट आहे.या संदर्भातील सविस्तर कार्यपध्दती दिनांक ०१.०३.२०१४ च्या शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आली आहे.

सदरहू क्रीडा सुविधा निमिती याजनेअंतर्गत, ॲग्रीकल्चर डेव्हलपमेंट ट्रस्ट, बारामती (जि. पुणे ) या संस्थेस जलतरण तलाव व विविध खेळा क्रीडा साहीत्य याकरीता, फेब्रुवारी-मार्च २०२० च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात, “मागणी क्र.ई-३ लेखाशिर्ष २२०४ क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (४०) क्रीडा सुविधा, (४०) (०१) क्रीडा सुविधा निर्मितीसाठी सहाय्य करणे (२२०४ ५७०६), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर ) योजनांतर्गत.” या लेखाशीर्षाखाली रु. १६२.०० लक्ष (अक्षरी एक कोटी बासष्ट लक्ष ) ची पुरवणी मागणी मान्य करण्यात आली आहे.

त्यानुसार, पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध करुन देण्यात आलेला रु. १६२.०० लक्ष (रुपये एक कोटी बासष्ट लक्ष) इतका निधी ॲग्रीकल्चर डेव्हलपमेंट ट्रस्ट, बारामती (जि. पुणे ) या संस्थेस अनुदान वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

सन २०१९-२० या वर्षाकरिता क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य उपलब्ध करण्याकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूदीमधून या संस्थेस खालीलप्रमाणे क्रीडा सुविधा निर्मितीकरीता निधी वितरीत करण्या याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| संस्थेचे नांव | प्रकल्प | अंदाजपत्रक्रीय रक्कम | शासन अनुदान | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| ॲग्रीकल्चर डेव्हलपमेंट ट्रस्ट, बारामती (जि. पुणे ) | जलतरण तलाव | रु. १७०.९५ लक्ष | रु. ९०.०० लक्ष | रु. ९०.०० लक्ष |
| | विविध खेळाचे क्रीडा साहित्य | रु. ९७.४४ लक्ष | रु. ७२.०० लक्ष | रु. ७२.०० लक्ष |

सदर संस्थेस उपरोक्त क्रीडा सुविधासाठी एकूण रु. १६२.०० लक्ष (अक्षरी रुपये एक कोटी बासष्ट लक्ष फक्त ) इतका निधी वितरणास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

(१) शासन निर्णय दिनांक ०१ मार्च, २०१४ मधील बाब क्र. ४ (अ) मधील क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्याबाबतच्या अटी व शर्ती नुसार संबंधित संस्थांना अनुदान वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

(२) संबंधित संस्थेस अनुदान वितरित झाल्यानंतर प्रकल्प पूर्णत्वाचा दाखला प्रकल्पाच्या छायाचित्रासह व उपयोगिता प्रमाणपत्रासह लवकरात लवकर व कमाल १ वर्षाच्या कालमर्यादेत सादर करणे बंधनकारक राहील. अन्यथा सदर वितरीत केलेले अनुदान, अनुदान वितरित झाल्याच्या दिनांकापासून प्रचलित दंडनीय व्याजासह वसुल करण्यात येईल. ही अट मान्य असल्याचे हमीपत्र प्रतिज्ञापत्राद्वारे संबंधित संस्थेकडून घेणे आवश्यक राहील.

(३) संबंधित संस्थेस मंजूर करण्यात आलेला निधी ७५ टक्के असून शासन अनुदानाव्यतिरिक्त उर्वरीत २५ टक्के स्वहिस्सा तसेच याशिवाय होणारा अधिकचा खर्च संस्थेने करणे आवश्यक आहे. शासन अनुदान व स्वहिस्सा खर्च करुन संस्थेने विनियोग प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक राहील.

(४) **सदर संस्थेस उपरोक्त क्रीडा सुविधाकरीता शासन अनुदानाच्या १०० टक्के निधी वितरीत करीत असल्यामुळे, संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयातील ४(अ) मधील ५) व १२) तसेच ४(ब) मधील (६) येथील अटी शिथील करण्यात येत आहे.**

२. उपरोक्त अटींच्या अधिन राहून सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेली तरतूद वितरीत करण्याकरीता संबधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत असून, आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. या संदर्भातील तरतूद संबंधित संस्थेस वितरित करताना वित्त विभागाच्या दिनांक ११/३/२०२० व १३/३/२०२० च्या परिपत्रकातील मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी. या योजनेवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा.

"मागणी क्र.ई-३ लेखाशिर्ष २२०४ क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (४०) क्रीडा सुविधा, (४०) (०१) क्रीडा सुविधा निर्माण करण्यासाठी सहाय्य (२२०४ ५७०६), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर ) योजनांतर्गत."

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३२७१५३६४७४७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2020.03.27 15:41:02 +05'30'

**( स्वा.म. नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल , महाराष्ट्र राज्य.
२. मा.मंत्री ( क्रीडा व युवक कल्याण ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री ( क्रीडा व युवक कल्याण ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद), महाराष्ट्र राज्य
४. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य
५. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,

७. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
८. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे (क्रीडा संचालनालयामार्फत)
११. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१२. संबंधित उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत),
१३. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१४. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. निवड नस्ती (क्रीयुसे-१)